**महाराष्ट्र सुजल व निर्मल अभियानांतर्गत प्रशासकीय मंजूरी देण्यात आलेल्या नागरी पाणी पुरवठा व मलनि:स्सारण योजनांना अनुदान वितरीत करण्याबाबत. बार्शी नगरपरिषद, जिल्हा सोलापूर.**

# महाराष्ट्र शासन

## पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग

## शासन निर्णय क्रमांकः सुनिअ-२०१४/प्र.क्र. ११०/पापु २२.

जी.टी.रुग्णालय संकुल, ७ वा मजला,
नवीन मंत्रालय, मुंबई ४००००१.
तारीख: ९ जानेवारी, २०१५.

वाचा :-

**१) शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्रमांक सुनिअ २००८/प्र.क्र.१/पापु २२, दिनांक २२ ऑक्टोबर, २००८,**

**२) शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्रमांक सुनिअ २००८/प्र.क्र.१९८/पापु २२, दिनांक २३ डिसेंबर, २००८,**

**३) शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्रमांक सुनिअ २०१४/प्र.क्र.४८/पापु २२, दिनांक १३ फेब्रुवारी, २०१४,**

**४) शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्रमांक सुनिअ २०१४/प्र.क्र.११०/पापु २२, दिनांक २२ मे, २०१४.**

प्रस्तावना :-

दिनांक २२ ऑक्टोबर, २००८ च्या शासन निर्णयान्वये नागरी पाणी पुरवठा, मलनि:स्सारण, शौचालय बांधकाम व घनकचरा व्यवस्थापनासंदर्भात पर्याप्त, गुणवत्तापूर्ण सेवा किफायतशीर सेवाशुल्कामध्ये उपलब्ध करुन देणे व विविध तांत्रिक, आर्थिक व व्यवस्थापकीय सुधारणा करण्याचे उद्दिष्ट निर्धारीत करुन महाराष्ट्र सुजल व निर्मल अभियान राबविण्यात येत आहे. राज्यातील सर्व नागरीकांना पाणी पुरवठा व मलनि:स्सारणाच्या सर्वव्यापक सुविधा निश्चितपणे उपलब्ध करुन देणे असा महाराष्ट्र सुजल व निर्मल अभियानाचा मुख्य उद्देश आहे.

२. महाराष्ट्र सुजल व निर्मल अभियानाच्या अंमलबजावणीसाठी विहित करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्त्वांनुसार प्रशासकीय मंजूरी देण्यात आलेल्या स्थानिक स्वराज्य संस्थांच्या पाणी पुरवठा योजनेसाठी नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेने भरलेल्या स्वहिश्श्याच्या प्रमाणात अनुज्ञेय अनुदान वितरीत करण्यात येते. नगरपरिषद बार्शी, जि.सोलापूर या नागरी संस्थेने स्वहिश्श्यापैकी रुपये ५२२.५३ लक्ष इतकी रक्कम (४९%) भरणा केली असल्याने राज्य शासनाकडून अनुज्ञेय असलेल्या अनुदानाच्या ४९% म्हणजेच रु.२०८९.२० लक्ष इतके अनुदान अनुज्ञेय आहे. तथापि, बार्शी नगरपरिषदेस यापूर्वी दिनांक २२.५.२०१४ च्या शासन निर्णयान्वये रुपये १०३८.१२ लक्ष इतके अनुदान वितरीत केले असल्याने उर्वरित अनुदान रुपये १०५१.०८ लक्ष इतके अनुदान वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय :-

महाराष्ट्र सुजल व निर्मल अभियानांतर्गत प्रशासकीय मंजूरी देण्यात आलेल्या नगरपरिषद बार्शी, जि.सोलापूर येथील पाणी पुरवठा व मलनि:स्सारण योजनेस संदर्भिय अनुक्रमांक ३ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मंजूरी देण्यात आली असून संबंधित नागरी स्थानिक संस्थेने त्यांनी भरावयाच्या रु.१०६५.९२ लक्ष इतक्या स्वहिश्श्यापैकी रुपये ५२२.५३ लक्ष इतकी रक्कम बँकेत जमा केली आहे. बार्शी नगरपरिषदेस यापूर्वी दिनांक २२.५.२०१४ च्या शासन निर्णयान्वये रुपये १०३८.१२ लक्ष इतके अनुदान वितरीत केले आहे. त्यामुळे बार्शी नगरपरिषदेस त्यांनी जमा केलेल्या स्वहिश्श्याच्या प्रमाणात म्हणजेच ४९% इतकी रक्कम रुपये २०८९.२० लक्ष इतके अनुदान अनुज्ञेय आहे. तथापि, या विभागाच्या दिनांक २२.५.२०१४ च्या शासन निर्णयान्वये बार्शी नगरपरिषदेस रुपये १०३८.१२ लक्ष इतके अनुदान वितरीत केले असल्याने उर्वरित रुपये १०५१.०८ लक्ष (रु.दहा कोटी एकावन्न लक्ष आठ हजार फक्त) इतके अनुदान पुढील विवरणानुसार वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे:-

**(रुपये लाखात)**

| शहराचे नांव | योजनेची एकूण किंमत | राज्य शासनाकडून अनुज्ञेय अनुदान (८०%) | नागरी संस्थेने निकषानूसार भरावयाची रक्कम (१०%) | नगर पालिकेसाठी कर्ज हिश्श्याची रक्कम (१०%) | नागरी संस्थेने भरलेली रक्कम | या अगोदर शासनाकडून वितरीत करण्यात आलेले अनुदान | राज्य शासनाकडून वितरीत करावयाचे अनुदान |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ |
| बार्शी (अ वर्ग नगरपालिका) | ५३२९.५९ | ४२६३.६७ | ५३२.९६ | ५३२.९६ | ५२२.५३ | १०३८.१२ | १०५१.०८ |
| | | | | | | एकूण | **१०५१.०८** |

२. सदर योजनेअंतर्गत नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांना अनुज्ञेय होणाऱ्या सदर अनुदानावरील खर्च मागणी क्रमांक वाय-२, २२१५ पाणी पुरवठा व स्वच्छता, ०१, पाणी पुरवठा १९२, स्थानिक संस्था, नगरपालिका इत्यादींना सहाय्य - राज्य योजना, (०२)(०२) नगरपालिकांच्या (स्थानिक संस्था) पाणी पुरवठा व मलनि:स्सारण योजनांसाठी सहाय्यक अनुदान (२२१५ १६४७), ३१ सहाय्यक अनुदान (वेतनेतर) या लेखाशिर्षाखाली करण्यात आलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा. संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था, बेलापूर, नवी मुंबई यांनी सदर लेखाशीर्षाखाली शासनाने उपलब्ध करुन दिलेल्या अनुदानातून उक्त विवरणपत्रातील नमुद स्तंभ क्रमांक ८ मध्ये दर्शविल्याप्रमाणे संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेला अनुदान वितरीत करावे, तसेच अनुदानाच्या या वितरणाचे स्वतंत्र लेखे ठेवावेत.

३. संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेने योजनेसाठी स्वतंत्र लेखे ठेवावेत आणि योजनेचा प्रगती अहवाल व उपयोगिता प्रमाणपत्रे नियमितपणे वेळोवेळी शासनास सादर करावीत.

४. महाराष्ट्र सुजल व निर्मल अभियानांतर्गत शासकीय अनुदान प्राप्त करुन घेण्यासाठी संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेने शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्रमांक सुनिअ २००८/प्र.क्र.१/पापु २२, दिनांक २२ ऑक्टोबर, २००८ मधील तरतूदीचा अवलंब करणे आवश्यक राहील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०११४१०४७२४०५२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sule Vaishali M

Digitally signed by Sule Vaishali M
DN: CN = Sule Vaishali M, C = IN, S = Maharashtra, O = Govt of Maharashtra, OU = Water Supply and Sanitation
Date: 2015.01.15 11:52:30 +05'30'

**( वैशाली सुळे)**
कार्यासन अधिकारी

प्रत,

१. मा.मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे खाजगी सचिव,
२. प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई,
३. सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई,
४. महालेखापाल-१ मुंबई/ नागपूर,
५. संचालक, नगरपालिका प्रशासन संचालनालय, मुंबई,
६. विभागीय आयुक्त, पुणे महसुल विभाग,
७. जिल्हाधिकारी, सोलापूर,
८. मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, नागरी व ग्रामीण योजना, ठाणे,
९. संचालक, पाणी व स्वच्छता सहाय संस्था, सिडको भवन, बेलापूर, नवी मुंबई,
१०. संचालक (वित्त), महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, सिडको भवन, बेलापूर, नवी मुंबई,
११. अध्यक्ष/मुख्याधिकारी, बार्शी नगरपरिषद, जिल्हा सोलापूर,
१२.जिल्हा कोषागार अधिकारी, सोलापूर,
१३. जिल्हा प्रकल्प अधिकारी (नगरपालिका), जिल्हाधिकारी कार्यालय, सोलापूर,
१४.वित्त विभाग/ नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई,
१५.कक्ष अधिकारी, पापु-०४ / पापु-२० / पापु २४, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई,

१६.निवडनस्ती, पापु-२२, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई.